**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील महत्वाच्या स्थळांचा विकास करणे याअंतर्गत मौजे देवळाली कॅम्प, जि.नाशिक येथे बुध्दविहाराच्या बांधकामासाठी ज्ञानमंदिर समिती या स्वयंसेवी संस्थेस अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१६/प्र.क्र.६०८/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ मावक/बुध्दविहार/अर्थ./ प्र.क्र.२९५/२०१६/का-१२/७७६, दि.२९/९/२०१६.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.६२५/ बांधकामे, दि.१०/१/२०१७.

प्रस्तावना :-

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच महत्वाच्या सांस्कृतिक व ऐतिहासीक स्थळांचा विकास करण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दतीनुसार संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, नाशिक यांचा बौध्दविहार बांधकामाचा रु. ६२,२२,८६२/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रकात एकूण ५६६.२१ चौ.मी.बांधकाम (तळ+पहिला मजला) प्रस्तावित आहे. सदर अंदाजपत्रक खाजगी वास्तुशास्त्रज्ञांनी तयार केलेल्या नकाशावर आधारीत आहे. सदर कामाच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, सा.बां.वि., नाशिक यांनी काही अटींच्या अधीन राहून तांत्रिक मान्यता दिली आहे. मा.मंत्री, (सा.न्या.व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या दि. २०/१०/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाच्या रु. ६२,२२,८६२/-इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, नाशिक यांच्या बौध्दविहार बांधकामाच्या रु. ६२,२२,८६२/- इतक्या खर्चाच्या प्रस्तावास इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेकरिता शासनाकडे पाठविले आहे. त्यामध्ये ४ टक्के आकस्मिक खर्च, ६ टक्के सेवाकर तसेच ३ टक्के व्यवसाय शुल्क करिता तरतूद करुन सदर कामाच्या एकूण रु. ७०,३२,२३४/- (रुपये सत्तर लक्ष बत्तीस हजार दोनशे चौतीस फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सार्वजनिक बांधकाम विभागाने मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार रु. ७०,३२,२३४/- (रुपये सत्तर लक्ष बत्तीस हजार दोनशे चौतीस फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयांत नमूद अटीच्या तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के इतका व ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, नाशिक यांचा हिस्सा १० टक्के इतका असेल. :-

१) प्रस्तुत प्रकल्पाच्या सविस्तर प्राकलनास मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि.,पुणे यांचे साक्षांकन घेण्यात यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पांचा नमुना नकाशा, वास्तु-मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेण्यात यावी. तसेच प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजूरी घेण्यात यावी.

३) प्रकल्पाचे काम सुरु करण्यापूर्वी सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) या कामी शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/बांधकामे, दिनांक १६/१२/२०१५ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीने नियमानुसार ई-निविदा प्रक्रिया राबवुन बांधकाम यंत्रणा निश्चित करुन काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सा.बां.विभागाने विहीत केलेल्या मानकानुसार, विहीत दर्जाचे व गुणवत्तेचे राहील, याकरीता प्रकल्पाची सा.बां.वि.च्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत नियतकालीक तपासणी करुन घेणे आवश्यक राहील.

७) प्रस्तुत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

८) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करुन ते विहीत वेळेतच पूर्ण होईल, याची सबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी दक्षता घ्यावी.

९) प्रकल्पाच्या देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी ही ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, नाशिक यांची राहील

१०) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

२. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, नाशिक यांनी हाती घेतलेल्या प्रकल्पावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तर समितीची राहील. परिच्छेद ३ मध्ये नमूद सर्व अटी ज्ञानमंदिर समिती, देवळाली कॅम्प, ता.जि.नाशिक या संस्थेला मान्य असल्याबाबत सदर संस्थेने करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी विभागीय समाजकल्याण अधिकारी, नाशिक विभाग, नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक यांनी प्रकल्पाच्या बांधकामाच्या सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३ यावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२),स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक

अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समजाकल्याण, पुणे यांची राहील.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०३२९१७४७५९९१२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.03.29 17:50:59 +05'30'

**( अ.कों. आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२ उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३ मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
४ अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
५ कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
६ महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७ प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक.
८ सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक.
९ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नाशिक.
१० निवडनस्ती.